आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता समग्र शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता निधी वितरण.

**केंद्र हिस्सा लेखाशिर्ष (२२०२आय ६४८) व राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२२०२ आय ६५७)**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-**२०२०**/ प्र.क्र. ०४ / कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २८ ऑक्टोबर, २०२०.

**वाचा :-**

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२० /प्र.क्र.६४ / अर्थ-३, दि.१६.०४.२०२०

२) वि. वि, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२० /प्र.क्र.६५ / अर्थ-३, दि.०४.०५.२०२०

३) आ.वि.वि., शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०४/ कार्या -६, दि. ०१.०६.२०२०, दि.१६.१०.२०२०.

४) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No. ७-२/२०२०-IS.१२ (GEN, SC, ST), दि. ५.८.२०२०

५) शालेय शिक्षण विभाग, नस्ती क्र. एसएसए-२०२० /प्र.क्र.१११/भाग- ३ सुधा /एस.डी.१.

**प्रस्तावना :-**

समग्र शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी आदिवासी घटकाकरीता केंद्र शासनाने वाचा क्र. ४ येथील आदेशान्वये केंद्र हिस्सा रु. १९५५.६६ लाख एवढा निधी वितरित केला आहे. सदर केंद्र हिस्सा व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.१३०३.७७ लाख एवढी तरतूद वितरित करण्याबाबत संदर्भाधीन क्र. ५ अन्वये शालेय शिक्षण विभागाने प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्तावास वित्त विभागाने सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १५ टक्केच्या मर्यादेत दिलेल्या मान्यतेस अनुसरुन या योजनेकरीता यापूर्वी संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी वजा जाता उपलब्ध निधी वितरित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टी-५ यामध्ये २२०२- सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षाखाली समग्र शिक्षा अभियान या योजनेकरीता वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन **अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १५ टक्केच्या मर्यादेत** पुढीलप्रमाणे केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा करीता एकुण **रु.१५८९.६६ लाख** (अक्षरी रु. पंधरा कोटी एकोन्नवद लाख सहासष्ट हजार) निधी वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| योजनेचे नाव/ लेखाशिर्ष | बाब | अर्थसंकल्पीय तरतुद | यापूर्वी वितरीत केलेली तरतूद | सदर शा. नि. अन्वये वितरित वितरीत करण्यात येत असलेली तरतुद |
|---|---|---|---|---|
| (०१)(१०)समग्र शिक्षा अभियान (२२०२ आय६४८) /केंद्र हिस्सा | ३१- सहायक अनुदाने | १७५००.०० | १५३५.३४ | १०८९.६६ |
| (०१)(११) समग्र शिक्षा अभियान (२२०२आय६५७) /राज्य हिस्सा | ३१- सहायक अनुदाने | १००००.०० | १०००.०० | ५००.०० |
| **एकूण** | | **२७५००.००** | **२५३५.३४** | **१५८९.६६** |

२. उपरोक्त प्रमाणे निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपूस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात मात्र फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक **संदर्भ क्र.५२१/२०२०/व्यय-१४, दि.१२.१०.२०२०** अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२०१७४६४३३७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c48977 37ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.10.28 15:19:34 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती/ठाणे.
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.